

# महाराष्ट्र शासन

**क्रमांक:-गौखनि-३४/०८१९/प्र.क्र.११७/ख**

महसूल व वन विभाग,
हुतात्मा राजगुरू चौक,मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०५ मार्च, २०२४.

**विषय :- गौण खनिज- कोल्हापूर**

सन २०१६-१७ करीता मौजे कनवाड, ता.शिरोळ जि.कोल्हापूर येथील वाळू गट क्र.२७९ या वाळू गटातून उत्खनन करता न आलेल्या वाळूच्या रक्कमेचा परतावा मिळणेबाबत.
श्री.प्रमोद लक्ष्मण कोळी, मौजे कनवाड ता.शिरोळ जि.कोल्हापूर

**शासन ज्ञापन -:**

जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांना त्यांचे पत्र क्र.कार्या/६अ/आरआर/१२११/२०१९, दि.३१/०७/२०१९ व क्र. कार्या/६ अ/आरआर/१३३५/२०२१, दि.१५/११/२०२१ रोजीच्या उपरोक्त विषयावरील पत्रास अनुलक्षून असे कळविण्यात येते की, सन २०१६-१७ या वर्षाकरीता दिनांक २७/१०/२०१६ रोजी घेण्यात आलेल्या वाळूगटांच्या लिलावामध्ये मौजे कनवाड, ता.शिरोळ येथील वाळूगट क्र.२७९ मधून एकुण १३२५ ब्रास वाळूसाठ्याकरीता श्री.प्रमोद लक्ष्मण कोळी, यांना रुपये ३८,१९,५००/- एवढ्या सर्वोच्च बोलीस मंजूर करण्यात आला होता. जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांनी दि.१३/२/२०१७ रोजीच्या आदेशान्वये वाळूगट मंजूर केला. तसेच लिलावधारकास दि.१८/२/२०१७ रोजी वाळूगटाचा प्रत्यक्ष ताबा देण्यात आला.

०२. तथापि, मा.राष्ट्रीय हरित न्यायाधिकरण, नवी दिल्ली यांचे दि.१९/४/२०१७ रोजीच्या आदेशानुसार दि.२१/०४/२०१७ रोजीच्या शासन पत्रान्वये दिलेल्या सूचनांनुसार नदीपात्रातील वाळू/रेती गटातून सक्शन पंपाद्वारे होणारे वाळू उत्खनन बंद करण्यात आले. त्यामुळे लिलावधारकास उक्त वाळूगटातून दि.२२/४/२०१७ रोजीनंतर वाळूचे उत्खनन करता आले नाही. त्यामुळे उक्त वाळूगटातून उत्खनन न करता आलेल्या वाळूची रक्कम परत मिळणेबाबत लिलावधारक यांनी शासनाकडे विनंती केली असता, शासनपत्र क्र.गौखनि-३४/०८१९/प्र.क्र.११७/ख-१, दि.२१/९/२०१९ अन्वये लिलावधारकाची विनंती अमान्य करण्यात आली.

०३. लिलावधारक यांनी उक्त शासनपत्र दि.२१/९/२०१९ रोजीच्या विरोधात मा.मंत्री (महसूल) यांचेकडे पुनर्विलोकन अर्ज दाखल केला असता, मा.मंत्री (महसूल) यांनी सुनावणी घेऊन दि.२०/७/२०२१ रोजी आदेश पारीत केले आहेत.

०४ . शासन निर्णय, दि.१२/३/२०१३ मधील (बी) (३) अनुसार लिलावाची १/४ रक्कम वगळता उर्वरित ३/४ रक्कम लिलावधारकाने लिलावाच्या दिवसापासून १५ दिवसांच्या आत शासनजमा करणे आवश्यक होते. परंतु लिलावधारकाने लिलावाची उर्वरित रक्कम शासन निर्णयामधील तरतूदीनुसार शासनजमा केलेली नाही. त्यामुळे शासन निर्णयामधील परिच्छेद (बी) (३) येथील तरतूदीनुसार लिलावाच्या सर्वोच्च बोलीच्या १/४ रक्कम रुपये रू.०९,५४,८७५/- (रुपये नऊ लाख चौपन्न हजार आठशे पंच्याहत्तर फक्त) एवढी रक्कम जप्त करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. तसेच, मा.राष्ट्रीय हरित न्यायाधिकरण, नवी दिल्ली यांचे दि.१९/४/२०१७ रोजीच्या आदेशानुसार दि.२१/०४/२०१७ रोजीच्या शासन पत्रान्वये दिलेल्या सूचनांनुसार नदीपात्रातील वाळू/रेती गटातून सक्शन पंपाद्वारे होणारे वाळू उत्खनन बंद करण्यात आल्यामुळे दि.२२/४/२०१७ नंतर वाळूगटातून लिलावधारकास उत्खनन न करता आलेल्या

वाळूची प्रमाणशीर रक्कम रु.१७,७०,९४९/- (रुपये सतरा लाख सत्तर हजार नऊशे एकोणपन्नास फक्त) परत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

०५. लिलावधारक श्री.प्रमोद लक्ष्मण कोळी, यांनी लिलावाची रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापुर्वी ही रक्कम अदा केलेली नाही, याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर उत्खनन न करता आलेल्या वाळूची प्रमाणशीर रक्कम रक्कम रु.१७,७०,९४९/- (रुपये सतरा लाख सत्तर हजार नऊशे एकोणपन्नास फक्त) अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

०६. या बाबीवर होणारा खर्च सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता "०८५३-अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग" १०२-खनिजाबाबत सवलत फी व स्वामित्वधन,९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग-वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या अंदाजपत्रकीय तरतुदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

०७. सदर शासन ज्ञापन, वित्त विभागाच्या क्र.विअप्र-२०१९/प्र.क्र.२०/२०१९/विनियम, दि.८/८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, भाग-२ नुसार महसूल व वन विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०८. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२४०३०६१६३६०३८११९ असा आहे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SHIVAJI SONAJI CHOURE

Digitally signed by SHIVAJI SONAJI CHOURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=fa37c7e079f23b78a27c84b9d6e46f94d549fc79ba170d5815f3619617b13313, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=03FE2B2D715BED4B0D90A99525AE06946672E68EA905C97DA50B34FD21223011, cn=SHIVAJI SONAJI CHOURE
Date: 2024.03.06 16:46:43 +05'30'

**( शिवाजी चौरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

जिल्हाधिकारी, कोल्हापूर

**प्रत:-**

१) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०० ०२०.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०० ०२०.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर
५) वित्त विभाग (व्यय-९/अर्थसंकल्प-३/६/१४ कार्यासने) मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६) कार्यासन अधिकारी (कार्यासन ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७) निवडनस्ती